# डॉक्टर डूलिटिल यांचे घरी परतणे



**ह्यू लोफ्टिंग**

# डॉक्टर डूलिटिल यांचे घरी परतणे

**ह्यू लोफ्टिंग**



मराठी : अश्विनी बर्वे

# अचानक आला पाहुणा

डॉक्टर डूलिटिल जहाजाने घरी येण्यासाठी निघाले. “आतापर्यंत आपण अनेक साहसी कामं केल,” ते म्हणाले.

“आपण सर्कस मगरीच्या आईला भेट दिली, आपण वाघांच्या राजाचा मुलावर इलाज केला, आणि आपण समुद्री डाकुंना मागे सोडून आलो.”

तेवढ्यात त्यांना मागे खट-खट-खट आवाज आला.



“अरे हा कसला आवाज आहे?” डॉक्टर डूलिटिलने आश्चर्याने विचारलं. मग सगळ्यांनी मिळून जहाजाची तपासणी केली. आत-बाहेर, वर-खाली सगळीकडे त्यांनी पाहिलं.



मग डेकवरचा एक दरवाज़ा उघडला आणि त्यातून एक छोटा मुलगा बाहेर आला.
त्याला बघून सगळ्यांना खूप आश्चर्य वाटलं.
“तू कोण आहेस?” डॉक्टर डूलिटिलने विचारलं.



“तुम्ही कोण आहात?”त्या छोट्या मुलाने विचारलं.
“ते समुद्री डाकू कुठे आहेत?” त्याने विचारलं. मग तो मुलगा डेकवर चढला.

“तू या जहाजावर कसा आलास?” डॉक्टर डूलिटिल म्हणाले.

“मला वाटलं की समुद्री डाकू होण्यात मोठी मजा येईल,” छोटा मुलगा म्हणाला.





“पण ते समुद्री डाकू नीच आणि मतलबी निघाले,” छोटा मुलगा म्हणाला. “म्हणून मी या खोलीत लपून राहिलो.”

“तू कुठला आहेस?” डॉक्टर डूलिटिलने विचारलं.

“मला जागेचं नाव नाही माहीत,” छोटा मुलगा म्हणाला. “पण मला माहित आहे ते या दिशेला आहे,” त्याने बोटाने दाखवलं. “नाहीतर या दिशेला” तो असंही म्हणाला.

डॉक्टर डूलिटिलला समजत नव्हतं की आता काय करावं? जर मुलाला घराचा पत्ता माहित नसेल तर त्याला घरी कसं पाठवणार?”

डॉक्टर डूलिटिलने एक शिट्टी वाजवली आणि दोन वेळा जहाजाचा हॉर्न वाजवला. तेव्हा लगेचच डॉल्फिन्सचा एक परिवार पोहत जहाजाजवळ आला.

“मला हे सांगा,” डॉक्टर डूलिटिलने त्यांच्यातल्या सगळ्यात वृद्ध आणि समजदार डॉल्फिनला विचारलं, “समुद्रात काय होत आहे, हे डॉल्फिनला नेहमी माहित असतं. अच्छा हे सांगा हा मुलगा कोणत्या द्वीपवरचा राहणारा आहे?”

“आम्हांला नाही माहित,” डॉल्फिन म्हणाले.



# वास घेणारा कुत्रा

डॉक्टर डूलिटिल जहाजाच्या डेकवर शतपावली करत होते. “विचार कर, बेटा,” डॉक्टर म्हणाले. “तू आपल्या घरून काही आणलं होतं का?” छोट्या मुलाने थोड्यावेळ विचार केला. “हो, मी हे आणलं होतं,” तो म्हणाला.





मग त्याने आपल्या खिश्यात हात घातला आणि खाण्याचा एक तुकडा काढला. “माझ्या आईने हे केलं होतं, आता एवढंच राहिलं.”



जिप-कुत्र्याने खाण्याचा पदार्थाचा वास घेतला. “हो,” तो भुंकत म्हणाला. “मी या मसाल्याचा वास याआधी घेतला आहे. चला माझ्याबरोबर.”

मग जिपने आपल्या नाकाने एका दिशेला इशारा केला. “हा सुगंध या दिशेने येत आहे.”

# प्रवासाहून परतणे

**मग डॉक्टर डूलिटिलने जहाजाला त्या दिशेला वळवलं जी जिपने आपल्या नाकाने दाखवली होती. जहाज अनेक तास त्या दिशेने जात होते. असं वाटत होतं की ते कधी त्या मुलाचं घर शोधू शकणार नाही. “बघा!” तो छोटा मुलगा ओरडला. मग तो जहाजाच्या डेकवरून उडी मारली आणि पोहत तो किनाऱ्यावर पोहचला.**



**...जिथे त्याची आई त्याची वाट बघत होती. “जरा माझ्यासाठी थांब,“ जिप धापा टाकत म्हणाला. “माझ्यासाठी सुद्धा” पुशमी–पुलयू म्हणाली. “माझ्यासाठी पण” डब-डब म्हणाला. “माझ्यासाठी पण,” गुब-गुब डुक्कर म्हणालं.**



“तुमचे खूप-खूप आभार,” आई म्हणाली. आईने आपल्या मुलाला जवळ घेतलं. “मी आपलं कर्ज कसं फेडू?” आईने डॉक्टर डूलिटिलची पापी घेत विचारलं.





डॉक्टर डूलिटिल यांना काही समजलं नाही. त्यांचा चेहरा लाल झाला. “मला भूक लागली आहे,” छोटा मुलगा म्हणाला. “आम्हांला पण भूक लागली आहे,” प्राण्यांनी म्हटलं. मग सगळ्यांनी मिळून पोटभर गरमागरम सूप प्यायलं.

“या प्रसंग तर आपण मोठ्या धामधूमीत साजरा करायला हवा,” डॉक्टर डूलिटिल म्हणाले. “चला आपण परेड करू या,” डब-डब बदक म्हणालं.





“मला चांगली परेड करण्यात खूप मजा येते.” पुशमी-पुलयू म्हणाली. मग छोटा मुलगा उठून उभा राहिला. “माझ्या मागे-मागे या!” तो ओरडला.

परेड मध्ये प्रत्येकाला मजा येत होती. ते लेफ्ट-राईट करत इकडे-तिकडे गेले. शेवटी डॉक्टर डूलिटिल म्हणाले, “आता आपली जाण्याची वेळ झाली”



माझी बहीण विचार करत असेल की आम्ही इतक्या महिन्यांपासून कुठे गायब आहोत. “आम्हांला तुमचं म्हणणं समजतं,” छोटा मुलगा दुःखी होत म्हणाला.

मग एकमेकांना भेटल्यानंतर आणि डोळ्यातल्या पाण्यासाहित ते तिथून निघाले. मग डॉक्टर डूलिटिल आणि त्यांचे प्राणी परत जहाजावर चढले.



## शेवटी घरी परतले

त्यानंतर डॉक्टर डूलिटिल आणि प्राणी आपल्या घरी रवाना झाले. खूप दिवस प्रवास केल्यानंतर त्यांना शेवटी पडिलबीचा किनारा दिसला. किनारा पाहून प्राणी आनंदाने नाचू लागले आणि खाली-वर उड्या मारू लागले. "विचार करतोय की आपल्या शहरात काय बदल झाला असेल," डॉक्टर डूलिटिल म्हणाले, "पहिल्या सारखंच सगळं असण्याची शक्यता आहे."



डॉक्टर डूलिटिलचे घर बिलकुल पहिल्या सारखंच होतं. त्यांच्या घरात खूप सारी पत्रं आणि बिलं पडलेली होती. फरशीवर धूळ जमा झालेली होती.



तेव्हाच डॉक्टर डूलिटिल यांची बहीण आली. “अरे व्वा!” ती आनंदाने ओरडली. तिने पुशमी-पुलयूला पाहिलं. “मी माझ्या जीवनात इतका सुंदर आणि अनोखा प्राणी कधीच पाहिला नव्हता.”

“त्याची लोकर एकदम जादूची आहे आणि लवकर लवकर वाढते,” डॉक्टर डूलिटिल म्हणाले. “एखाद्या जादूने जर आपण ही बिले भरू शकलो तर.”

“जादुची लोकर!” त्यांची बहीण म्हणाली. बहिणीचे डोळे चमकले. “मी तुमच्या सगळ्यांसाठी त्या लोकरीने एक-एक स्वेटर विणेल. मग कोणालाही थंडी वाजणार नाही.”





मग डॉक्टर डूलिटिल यांच्या बहिणीने खूप सारे स्वेटर विणले आणि ते विकले. अशा पद्धीतीने त्यांनी खूप पैसे मिळवले. त्या पैशातून त्यांनी बिलं भरली. आता घर स्वच्छ होतं. प्रत्येक प्राण्याजवळ स्वेटर होतं. प्रत्येकाकडे भरपूर खायला अन्न होतं. डॉक्टर डूलिटिल शहरातील सगळ्या प्राण्यांवर प्रेम करत. त्यानंतर सगळे लोक आनंदी आणि स्वेटरच्या ऊबेत राहिले.

समाप्त

